**नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग ( महाराष्ट्र समृध्दी महामार्ग )**
**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अंतर्गत मंजूर झालेल्या वन जमिनीचा मोबदला निश्चित करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१८/अनौस.१३/प्र.क्र. ५७ /का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- १३ जून, २०१८

**वाचा** :- अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अन्वये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३ (१) नुसार वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना स्वत:च्या उपजीविकेकरिता शेती कसण्यासाठी वनजमिनी धारण करण्याचा व त्यामध्ये राहण्याचा हक्क; निस्तार सारखे हक्क; गावाच्या सीमांतर्गत किंवा सीमेबाहेर पारंपारिकरीत्या गोळा केले जाणारे गौण वनोत्पादन गोळा करणे, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क; पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविण्यास हक्कदार असणे; निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरीत्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वनस्त्रोताचे संरक्षण, पुनर्निर्माण, संवर्धन, व्यवस्थापन करण्याचे हक्क इ. विविध वनहक्क प्राप्त झाले आहेत.

२. नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती महामार्गाकरीता ( महाराष्ट्र समृध्दी महामार्ग ) प्रस्तावित वळतीकरण करावयाच्या जमिनींमध्ये खाजगी जमीन तसेच राखीव व संरक्षित वन जमिनीव्यतिरीक्त उक्त अधिनियमान्वये प्राप्त झालेल्या वनपट्टयांचाही समावेश होत आहे. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्काची मान्यता) अधिनियम, २००६ च्या तरतूदीअन्वये मंजूर झालेल्या वनजमीनीचे क्षेत्र एखाद्या सार्वजनिक प्रकल्पाने बाधीत झाले तर, अशा वनहक्कधारकास कोणत्या दराने मोबदला दिला जावा, याबाबत सदर अधिनियमामध्ये कोणतीही तरतूद समाविष्ट केलेली नाही. त्यामुळे नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग ( महाराष्ट्र समृध्दी महामार्ग ) या प्रकल्पामुळे बाधित होणाऱ्या वनहक्कधारकांना मोबदला देण्याच्या अनुषंगाने समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग ( महाराष्ट्र समृध्दी महामार्ग ) या प्रकल्पामुळे बाधित होणाऱ्या वनहक्कधारकांना मोबदला देण्याच्या अनुषंगाने प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखालील पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यांत येत असून सदर समितीची संरचना खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | डॉ. निरज हातेकर, संचालक ,मुंबई अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था ,मुंबई, | सदस्य |
| ४ | श्री. शेखर गायकवाड, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | सदस्य |
| ४ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ठाणे | सदस्य |
| ५ | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पूणे | सदस्य सचिव |

२. उक्त समिती अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ मधील तरतूद विचारात घेऊन नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग ( महाराष्ट्र समृध्दी महामार्ग ) या प्रकल्पामुळे बाधित होणाऱ्या वनहक्कधारकांना मोबदला देण्यासंदर्भातील अहवाल दिनांक १५ जुलै, २०१८ पर्यंत शासनास सादर करील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०६१३१४५६५५९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Mahadu Raut

Digitally signed by Pandurang Mahadu Raut
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=136cc102e03660c61e3577e800c6edb8125d21d6c9d7742a980d024e919fa85c, cn=Pandurang Mahadu Raut
Date: 2018.06.13 14:59:21 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४ प्रधान सचिव ( महसूल ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५ प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव ( मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव ( वने ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११. प्रधान मुख्य वन संरक्षक ( वन बल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ठाणे
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. श्री. शेखर गायकवाड, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१५. डॉ. निरज हातेकर, संचालक ,मुंबई अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था ,मुंबई,
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती,
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१७. निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.